नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना देणेबाबत (नियतकालीक) (नाशिक विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्र.बदली-२०२४/प्र.क्र.१६२/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ०६ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-** महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार, नायब तहसिलदार संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नायब तहसिलदाराचे नाव | सद्य कार्यरत पदनाम | बदलीने दिलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. विठ्ठल मोराणकर | नायब तहसिलदार, निवडणुक १२६ तहसिल कार्यालय नाशिक, जि. नाशिक | नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय कळवण, जि. नाशिक (श्री. महाजन यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| २ | श्री. पी.टी. महाजन | नायब तहसिलदार, उप विभागीय अधिकारी कार्यालय कळवण, जि. नाशिक | नायब तहसिलदार (निवडणूक), ११४ विसमस मालेगाव, जि. नाशिक (श्री. गोतरणे यांच्या अंशत: बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ३ | श्री.अजित मधुकर शिंत्रे | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय अक्कलकुवा, जि. नंदुरबार | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय नंदुरबार, जि. नंदुरबार (श्री. गावीत यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ४ | श्री.रिनेश डी.गावित | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय नंदुरबार, जि. नंदुरबार | नायब तहसिलदार (महसूल), जिल्हाधिकारी कार्यालय नंदुरबार, जि. नंदुरबार (श्री.चौधरी यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्री.एस.डी.ओहोळ | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय राहाता, जि. अहमदगनर | सद्य पदावर १ वर्ष मुदतवाढ |
| ६ | श्री. आर.डी. आहिरे | नायब तहसिलदार (निवडणुक), जिल्हाधिकारी कार्यालय नाशिक, जि. नाशिक | सद्य पदावर १ वर्ष मुदतवाढ |
| ७ | श्री.एस.व्ही.रोडे | नायब तहसिलदार (निवडणुक), तहसिल कार्यालय अहमदनगर, जि. अहमदनगर | सद्य पदावर १ वर्ष मुदतवाढ |

२. आगामी सार्वत्रीक विधानसभा निवडणूक-२०२४ च्या अनुषंगाने विधानसभा मतदारसंघाच्या मतदारयाद्यांचा विशेष संक्षिप्त पुर्नरिक्षण कार्यक्रम चालू असून दि.३०.०८.२०२४ पर्यंत सदर कार्यक्रम राबविण्यात येणार आहे. सबब, विशेष संक्षिप्त पुर्नरिक्षण कार्यक्रमाशी संबंधित नायब तहसीलदार (निवडणुक) व अन्य नायब तहसिलदारांना सदरचा कार्यक्रम संपल्यानंतरच कार्यमुक्त करण्याची कार्यवाही संबंधित विभागीय आयुक्तांनी करावी. तसेच, विशेष संक्षिप्त पुर्नरिक्षण कार्यक्रमाशी संबंधित नायब तहसीलदारांच्या पदावर पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या नायब तहसीलदारांना देखील सदरचा कार्यक्रम संपल्यानंतर कार्यमुक्त करावे. विशेष संक्षिप्त पुर्नरिक्षण कार्यक्रमाशी संबंधित नसलेल्या नायब तहसीलदारांना कार्यमुक्त करताना संबंधित अधिकारी नियुक्तीच्या प्रतीक्षेत राहणार नाही, याची दक्षता विभागीय आयुक्तांनी घ्यावी. तसेच बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी संबंधित अधिकारी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत deske९-rfd@mah.gov.in या ई-मेलद्वारे / टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

३. या आदेशान्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना सद्य पदावर दि.३१.०५.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. त्यानंतर सदर अधिकारी बदलीस पात्र राहतील.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित

अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या **अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन** (dies non) **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू न झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी.

८. सदरहू आदेशानुसार बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी व गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०८०६१९५५३१८७१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.06 20:10:04 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक .

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६) जिल्हाधिकारी, नाशिक, अहमदनगर, नंदुरबार, जळगाव, धुळे.
७) प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई .
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, अहमदनगर, नंदुरबार, जळगाव, धुळे
९) संबंधित आहरण व वितरण अधिकारी.
१०) सर्व संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांच्यामार्फत)
११) उप सचिव (ई-९) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२